श्री. हिंमत गैंधल शिरसाठ, रोजंदारी कर्मचारी यांना न्या.कालेलकर करारानुसार पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर <u>घेण्याबाबत.</u>

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०१४/प्र.क्र.१२७/आस्था-१०,**
**बांधकाम भवन,२५ मर्झबान पथ,**
**फोर्ट,मुंबई-४०० ०३२,**
तारीख: **२७ ऑक्टोबर, २०१६.**

<u>वाचा</u>

1) **शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५,दि.२४ एप्रिल,२००१.**
2) **विभागीय आयुक्त,नाशिक यांचे पत्र क्र. विकास/कार्या.क्र.१९/आस्था-२ / ३८५९० / १६ / १७९६८, दि.०१.९.२०१६.**

प्रस्तावना:- रोजंदारी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना न्या. कालेलकर करारानुसार पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यासंदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाने धोरणात्मक निर्णय घेतला असून, जे कर्मचारी सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.२४.४.२००१ च्या शासन निर्णयामधील अटींची पूर्तता करतील, त्यांना न्या.कालेलकर करारानुसार फायदे देण्यासाठी रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरविले आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि. २४.४.२००१ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १ मधील अट क्र.१ नुसार रोजंदारी / कार्यव्ययी आस्थापनेवरील जे कर्मचारी शासन सेवेत /जिल्हा परिषद सेवेत कार्यरत आहेत आणि त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून त्यांच्या सलग सेवेस उशीरात उशीरा दि.३१.१२.१९९८ रोजी ५ वर्षे व प्रत्येक वर्षी कामाचे २४० दिवस पुर्ण झालेले आहेत आणि करारातील अटींची पूर्तता करतील अशा कर्मचाऱ्यांना पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरविले आहे.

२. न्या. कालेलकर करारातील वरील तरतूद तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.२४.४.२००१ च्या शासन निर्णयातील, परिच्छेद- ३ व ४ मध्ये नमूद तरतूदींच्या अनुषंगाने विभागीय आयुक्त, नाशिक विभाग यांनी पाठविलेल्या प्रस्तावाची छाननी केली असता, असे दिसून येते की, श्री.शिरसाठ यांची नियुक्तीच्या दिनांकापासून दिनांक ३१/१२/१९८७ पर्यंत ५ वर्षाची सलग सेवा झालेली आहे. त्यामुळे ते रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरतात.

३. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.२४.४.२००१ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १ मधील अट क्र. (१) नुसार जे कर्मचारी त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून शासन सेवेत कार्यरत आहेत आणि ज्यांच्या सलग सेवेस उशिरात उशिरा दिनांक ३१/१२/१९९८ रोजी ५ वर्षे पूर्ण झालेली आहेत, असे कर्मचारी

रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरतात. श्री. हिम्मत गैंधल शिरसाठ यांची जिल्हा परिषद, धुळे येथील लघुसिंचन विभागात ऑईलमन पदावर कार्यव्ययी आस्थापनेवर वे.श्रे.२०५-५-२५०-७-२८५-७-२८५-१०-३०५-द.रो.-१०-३५५ मध्ये दिनांक १७/१२/१९८२ रोजी नियुक्ती झाली. लघुसिंचन विभागाकडील टिपर, टॅंकर, रोलर इ. अवजड वाहनांची कामे संपुष्टात आल्यामुळे ती वाहने सन १९८८-८९ पासून बंद करण्यात आली. सबब ऑईलमनचे काम राहीले नाही. अशवेळी श्री. शिरसाठ यांना कार्यमुक्त न करता कार्यालयीन कामकाजाच्या दृष्टीकोनातून त्यांच्या सेवा कार्यालयीन कामात उपयोगात आणल्या. श्री. शिरसाठ यांच्या सेवा कार्यालयीन कामासाठी वापरतांना त्यांना परिचर पदाचे काम व वेतनश्रेणी दिली जात होती. त्यांच्या वेतनातून भविष्य निर्वाह निधीची कपात करण्यात येत होती. मात्र त्यांचे पदनाम बदलले नव्हते. श्री. शिरसाठ हे दिनांक १७/१२/१९८२ पासून सन १९८८-८९ पर्यंत कार्यव्ययी आस्थापनेवर कार्यरत होते. तदनंतर त्यांच्या सेवा जिल्हा परिषद, धुळे यांनी परिचर पदावर घेतल्या आहेत. श्री.शिरसाठ यांची नियुक्तीच्या दिनांकापासून दिनांक ३१/१२/१९८७ पर्यंत ५ वर्षाची सलग सेवा झालेली आहे. त्यामुळे श्री. शिरसाठ यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र असल्याची शिफारस विभागीय आयुक्त, नाशिक यांनी केलेली आहे.

## <u>शासन निर्णय</u>

रोजंदारी /कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४.४.२००१ मधील तरतूदी विचारात घेऊन सोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे विभागीय आयुक्त, नाशिक यांचे प्रस्तावातील श्री. शिरसाठ यांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार या निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मधील रोजंदारी कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रकाना क्र.६ मधील पदावर व रकाना क्र.७ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासून रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास शासन मान्यता देत आहे:-

२. शासनाच्या या निर्णयानुसार कर्मचाऱ्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर आणल्यानंतर त्यांना न्या.कालेलकर कराराच्या तरतूदीनुसार अनुज्ञेय ठरणाऱ्या वेतनवाढीतील फरकाचे विनियमन पुढील प्रमाणे करण्यात येईल:-

- जिल्हा परिषद, धुळे मधील श्री. शिरसाठ यांना नियुक्तीच्या दिनांकापासून शासन सेवेत ५ वर्षे पुर्ण केल्याच्या दिनांकापासून त्यांचे रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेचे आदेश निर्गमित केल्याच्या दिनांकापर्यंतच्या, वेतनवाढीतील फरकाची रक्कम, (सर्व प्रकारच्या भत्त्यासहित) ही त्यांच्या मृत्युपश्चात त्यांची पत्नी श्रीमती यमुनाबाई हिम्मत शिरसाठ यांना धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी.

३. वर नमूद केलेल्या थकबाकीच्या रकमेवर कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही आणि संबंधित कर्मचाऱ्यांकडून अथवा दिवंगत कर्मचाऱ्यांच्या वारसाकडून भविष्यात व्याजाबाबतची मागणी करण्यांत येणार नाही, अशाप्रकाराचे प्रतिज्ञापत्र त्यांनी जिल्हा परिषदेला सादर करणे बंधनकारक राहील.

४. संबंधित जिल्हा परिषदेने, या शासन निर्णयान्वये कर्मचाऱ्याला चालू आर्थिक वर्षात अदा करावा लागणारा खर्च मंजूर अनुदानातून करावयाचा आहे.

५. रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेचे आदेश निर्गमित झाल्यानंतर, सदर आदेश मान्य नसल्यास त्याबद्दलचे लेखी प्रतिवेदन आदेश मिळाल्यापासून तीन महिन्यात सादर करणे आवश्यक आहे. या मुदतीत कोणतेही प्रतिवेदन प्राप्त न झाल्यास त्यांचे काढलेले आदेश अंतिम समजण्यात येतील व त्यानंतर त्यांची कोणतीही तक्रार विचारात घेतली जाणार नाही.

६. अस्थायी आस्थापनेवर रुपांतरित झालेले पद संबंधित पदधारक ज्या दिनांकापर्यंत सेवेत असतील त्या दिनांकापर्यंत चालू ठेवण्यात येत आहे.

७. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४ एप्रिल, २००१ अन्वये दिलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२७१७१९५१९३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Girish Dinkar Bhalerao

Digitally signed by Girish Dinkar Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=415001, st=Maharashtra, cn=Girish Dinkar Bhalerao
Date: 2016.10.28 16:05:12 +05'30'

**गिरीश भालेराव**

उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) महालेखापाल,महाराष्ट्र-१ मुंबई/ महाराष्ट्र-२,नागपूर,

२) प्रधान सचिव, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,

३) सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,

४) विभागीय आयुक्त,विभागीय आयुक्त कार्यालय,नाशिक विभाग,

५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, धुळे.

६) मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

७) मा.राज्यमंत्री, (ग्रा.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

८) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद,नाशिक.

९) वित्त विभाग (व्यय-१५) मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,

१०) निवड नस्ती, कार्यासन आस्था.१०,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

# परिशिष्ट-"अ"

शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.पदनि-२०१४/प्र.क्र.१२७/ आस्था-१०,

दिनांक- २७ ऑक्टोबर, २०१६ चे सहपत्र.

| अ.क्र. | कर्मचारीचे नाव | आस्थापनेचा प्रकार | नेमणूकीचे पद | विभागाचे नाव | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाच्या पदाचे नाव | **ज्या दिनांकापासून रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचा आहे तो दिनांक** |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.हिंमत गैंधल शिरसाठ | कार्यव्ययी | ऑईलमन | जि.प.धुळे | परिचर | १७/१२/१९८२ |